राज्यातील आपले सरकार सेवा केंद्र चालक
यांच्या कामाच्या वेळेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२४१८/प्र.क्र.६८/आसक

बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: २४ ऑगस्ट, २०१८.

वाचा-

**१) शासन निर्णय क्रमांकः संग्राम-२०१५/प्र.क्र.९३/संग्राम कक्ष, दि.११ ऑगस्ट, २०१६**

प्रस्तावना-

राज्यातील आपले सरकार सेवा केंद्र चालक हे वेगवेगळ्या प्रकारे कार्यालयीन कामकाज करत आहेत. काही ठिकाणी सकाळी ९.०० ते संध्याकाळी ६.००, काही ठिकाणी सकाळी १०.०० ते संध्याकाळी ५.०० तर काही ठिकाणी सकाळी ११.०० ते संध्याकाळी ६.०० अशी वेगवेगळी कार्यालयीन वेळ असून आपले सरकार सेवा केंद्र चालक यांची कार्यालयीन कामाची वेळ काय आहे, याबाबत शासनाकडे विचारणा होत आहे. याबाबतची संभ्रमावस्था दूर करण्यासाठी आवश्यक ते आदेश निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

शासन निर्णय दि.११ ऑगस्ट, २०१६ अन्वये राज्यातील ग्रामपंचायतींमध्ये आपले सरकार सेवा केंद्राची स्थापना करण्यात आली आहे. या केंद्रांमध्ये सीएससी-एसपीव्ही या कंपनी मार्फत केंद्र चालकांची नियुक्ती करण्यात आली असून ते खाजगी उद्योजक (Village level Entrepreneur) आहेत. सदरहू आपले सरकार सेवा केंद्रांमधून ग्रामपंचायतीतील विविध कामां संबंधित डेटा एन्ट्री (G२G) ची कामे करण्यात येतात. उदा. प्रियासॉफ्ट, जिपीडीपी, एमॲक्शनसॉफ्ट, ई-ग्रामसॉफ्ट इ. संगणक प्रणालींवर माहिती भरण्यात येते. तसेच ग्रामपंचायातीच्या हद्दीतील रहिवाश्यांना जन्म-मृत्यू प्रमाणपत्र, उत्पन्नाचा दाखला, रहिवासी प्रमाणपत्र इ. विविध प्रकारचे दाखले (G२C) देण्यात येतात. त्या व्यतिरिक्त लाईट बिल भरणा, टेलीफोन बिल भरणा, रेल्वे आरक्षण इ. (B२C) सेवा देण्यात येतात. तसेच बँकांशी अनेक वित्तीय संस्थांशी संबंधित इतर सेवा (FI) देखील देण्यात येतात.

उपरोक्त G२G आणि G२C सेवा या ग्रामपंचायतीच्या कामाशी निगडीत असल्याने ग्रामपंचायतींच्या कार्यालयीन कामाच्या वेळेत केंद्र चालकांनी काम करणे आवश्यक आहे. उर्वरित B२C आणि FI या सेवा संबंधित केंद्र चालक हा खाजगी उद्योजक या नात्याने सेवा देत असल्याने कामकाजाची वेळ संबंधित केंद्र चालकाने आवश्यकतेनुसार ठरवावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201808241252158320 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandit Jadhav

Digitally signed by Pandit Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, cn=Pandit Jadhav
Date: 2018.08.24 16:40:36 +05'30'

**( पंडित जाधव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२. सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी.
३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
४. सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (पंचायत/सा.प्र.वि).
५. सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी.
६. सर्व सरपंच ग्रामपंचायत,महाराष्ट्र राज्य (व्दारे केंद्र चालक सी.एस.सी-एस.पी.व्ही).
७. सर्व ग्रामसेवक /ग्रामविकास अधिकारी, ग्रामपंचायत, महाराष्ट्र राज्य (व्दारे केंद्र चालक सी.एस.सी-एस.पी.व्ही/ ई-मेल).
८. सीएससी-एसपीव्ही ई-गव्हर्नन्स इंडिया लिमिटेड, इलेक्ट्रॉनिक निकेतन, तिसरा मजला, DeITY, ६ सीजीओकॉम्प्लेक्स, लोधी रोड, नवी दिल्ली-११०००३.
९. माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१०. स्वीय सहायक सचिव (ग्रा.वि), मा. सचिव (ग्रा.वि) यांचे अवलोकनार्थ.
११. निवड नस्ती, आपले सरकार कक्ष, ग्रामविकास व पंचायत राज विभाग.

प्रत माहितीसाठी

१. मा.विरोधी पक्ष नेते, विधानसभा/विधान परिषद,महाराष्ट्र विधानमंडळ,मुंबई.
२. सर्व मा. विधानसभा/विधान परिषद सदस्य,महाराष्ट्र विधानमंडळ,मुंबई.

३. मा. राज्यपालांचे सचिव.
४. मा.मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव.
५. मा.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय.
६. शासनाचे मुख्य सचिव.
७. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व प्रशासकीय विभाग).
८. सर्व विभागीय आयुक्त.
९. सर्व सहसचिव/उपसचिव (ग्रामविकास विभाग).
१०. सर्व जिल्हाधिकारी.
११. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव.
१२. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव.